महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम, २००२
अन्वये "शासकीय माहिती अधिकारी" व
"अपिलीय प्राधिकारी" पदनिर्देशित करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
आदेश क्र. एचडीई-२००३/प्र.क्र.३९/आस्था-२,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.दिनांक:- १९ नोव्हेंबर, २००३

वाचा :- १) शासन आदेश, गृह विभाग, क्र. एचडीई-२००३/प्र.क्र.३९/आस्था-२, दिनांक १०.२.२००३

२) शुध्दीपत्र, गृह विभाग, क्रमांक एचडीई-२००३/प्र.क्र. ३९/आस्था-२, दिनांक २६.२.२००३.

३) शुध्दीपत्र, गृह विभाग, क्रमांक एचडीई-२००३/प्र.क्र.३९/आस्था-२, दिनांक १६.८.२००३.

४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक ममाअ-२००२/प्र.क्र. १२७/०२/५, दिनांक १४.८.२००३.

## आदेश

शासनाच्या कारभारात पारदर्शकता आणण्यासाठी व जबाबदार प्रशासन तयार करण्याकरीता व शासन कारभाराची जनतेला जास्तीत जास्त माहिती मिळावी याकरिता दिनांक २३ सप्टेंबर, २००२ रोजी "महाराष्ट्र माहितीचा अधिकार अध्यादेश, २००२" प्रख्यापित करण्यात आला होता. या अध्यादेशातील कलम ५ (१) नुसार जनतेला माहिती देण्याकरिता "शासकीय माहिती अधिकारी" पदनिर्देशित करणे आवश्यक असल्याने उपरोक्त संदर्भाधिन दिनांक १०.२.२००३, दिनांक २६.२.२००३ तसेच दिनांक १६.८.२००३ च्या आदेशान्वये गृह विभागातील "शासकीय माहिती अधिकारी" व "अपिलीय प्राधिकारी" घोषित करण्यात आले आहेत.

२. आता सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १४.८.२००३ च्या शासन परिपत्रकान्वये नमुद केल्याप्रमाणे दिनांक २३ सप्टेंबर, २००२ रोजी प्रख्यापित केलेला "महाराष्ट्र माहितीचा अधिकार अध्यादेश, २००२" हा विहित मुदतीत अधिनियमात रुपांतर होऊ न शकल्यामुळे व्यपगत झाला आहे. तथापि, याबाबतचे विधेयक विधीमंडळात मंजूर होऊन विधेयकास मा. राष्ट्रपतींची मंजुरी मिळाली असल्याने या विधेयकाचे अधिनियमात रुपांतर होऊन "**महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम, २००२**" दिनांक २३.९.२००२ पासून पुर्वलक्षी प्रभावाने अंमलात आलेला आहे. हा अधिनियम दिनांक

रोटा प्रिंट/एच–967(500–12–03)1

D:\2003\oct\036RIGHT OF INFORMATION

२३ सप्टेंबर, २००२ पासून लागू करण्यात आला असल्याने दरम्यानच्या कालावधीमध्ये माहितीची मागणी करणारे जे अर्ज प्रलंबित / अनिर्णित असतील त्यावर कार्यवाही आवश्यक ठरते.

३. उपरोक्त बाबी विचारात घेता संदर्भाधिन क्रमांक १, २, ३ येथील आदेशान्वये घोषित करण्यात आलेल्या गृह विभागातील माहिती अधिकारी यांनी अधिनियमांतर्गत कार्यवाही करणे क्रमप्राप्त आहे. गृह विभागातील पूर्वी घोषित केलेले माहिती अधिकारी व यात काही फेरबदल झालेले असे "शासकीय माहिती अधिकारी" कलम (५)(१) अन्वये खालीलप्रमाणे पुन्हा उद्‌धृत करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | उप विभाग | पदनिर्देशित शासकीय माहिती अधिकारी | दुरध्वनी क्रमांक | अपिलीय प्राधिकारी | दुरध्वनी क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | पोलीस | श्री. हर्षदिप कांबळे, उप सचिव | २२०४९४६४ | प्रधान सचिव( अ. व सु.) | २२०२८६४८ |
| २ | पर्यटन | श्री. ब. ग.शिर्के, उप सचिव | २२०२२७०२ | प्रधान सचिव(पर्यटन) | २२०२५०८८ |
| ३ | तुरुंग | श्री. कि. ब. ठाकूर, उप सचिव | २२०२४८६९ | प्रधान सचिव(तुरुंग) | २२०२४२२१ |
| ४ | रा.उ.शु. व बंदरे | श्री. कृ.श्री. घाडगे, उप सचिव | २२०२३१८४ | प्रधान सचिव (परिवहन व रा.उ.शु.) | २२०२५००९ |
| ५ | परिवहन | श्री. प्र.कृ.सगदेव, उप सचिव | २२०२५३५६ | प्रधान सचिव (परिवहन व रा.उ.शु.) | २२०२५००९ |

४. उपरोक्त **"शासकीय माहिती अधिकारी"** यांनी महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम, २००२ मधील नियमांचे काटेकोरपणे पालन करावे. **"शासकीय माहिती अधिकारी"** यांना गृह विभागातील संबंधित अधिकारी / कर्मचारी यांनी वेळोवेळी आवश्यक ती माहिती द्यावी व सक्रीय सहकार्य करावे.

५. महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम, २००२ च्या तरतुदीमधील कोणत्याही तरतुदीचे उल्लंघन झाल्यास किंवा अर्जदारांना खोटी माहिती पुरविल्यास किंवा शासकीय माहिती अधिकाऱ्यांने जनतेला सहकार्य न केल्यास इ. बाबीसाठी सदर अधिनियमातील तरतुदीनुसार सर्व अधिकारी/ कर्मचारी शिक्षेस पात्र ठरतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( हर्षदिप कांबळे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

एच-967(500-12-03)1अ

D:\2003\oct\036RIGHT OF INFORMATION

प्रतिलिपी :-

मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ३२.
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई.
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिलीय शाखा, मुंबई.
प्रबंधक, लोक आयुक्त/ उप लोक आयुक्त, मुंबई.
शासनाचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई.
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय(विधानसभा) मुंबई /नागपूर.
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय(विधानपरिषद) मुंबई/नागपूर.
राज्य निवडणुक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई - २१.
कारागृह महानिरीक्षक, सेंट्रल बिल्डींग, पुणे.
परिवहन आयुक्त, मुंबई- ५१.
आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, ओल्ड कस्टम हाऊस, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, बॅलॉर्ड इस्टेट, मुंबई.
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, नवी मुंबई, नाशिक, पुणे, सोलापूर, औरंगाबाद, अमरावती, ठाणे, नागपूर.
जिल्हा पोलीस अधिक्षक(सर्व)
अपर मुख्य सचिव(गृह) यांचे स्वीय सहायक.
प्रधान सचिव(अ. व सु.)/ प्रधान सचिव(विशेष)/ प्रधान सचिव(पर्यटन) /
प्रधान सचिव(परिवहन)/ प्रधान सचिव(तुरुंग) यांचे स्वीय सहायक.
सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती, आस्थापना-२.

---